




जनहिताय सर्वदा

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID :dokh.rfd@maharashtra.gov.in

---

क्रमांक: गौखनि-३७/०९१९/प्र.क्र.१३०/ख-१ दिनांक:- २० जून,२०२४

विषय:- गौण खनिज- सोलापूर
सन २०१८-१९ करीता मौजे मिरी-सिद्धापूर, ता. मोहोळ-मंगळवेढा, जि. सोलापूर या वाळू गटामधून उत्खनन करता न आलेल्या वाळूचा परतावा मिळणेबाबत
मे. आर.बी. एंटरप्रायजेस तर्फे श्री. रेवणसिद्ध बसवराज भिंगे

**शासन ज्ञापन :-**

सन २०१८-१९ या वर्षाकरीता भिमा नदी पात्रामधील मौजे. मिरी - सिध्दापुर, ता. मोहोळ-मंगळवेढा हा वाळू गट ३४,७७० ब्रास वाळू परिमाणाकरीता मे. आर.बी. एंटरप्रायजेस तर्फे प्रो.प्रा. रेवणसिद्ध बसवराज भिंगे यांना दिनांक १०.०६.२०१९ च्या आदेशान्वये जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी मंजूर केला होता. तथापि, दि.२८/०७/२०१९ रोजी उजनी धरण अतिवृष्टीने १००% भरल्याने धरणातून सोडलेल्या पाण्यामुळे नदीपात्रात पाणी दुथडी भरुन वाहत होते. तसेच, दि.११/०९/२०१९ रोजी नदीपात्रात १७ फुट इतके पाणी असल्याने उर्वरीत दिवसही पाणी कमी होण्याची शक्यता नसल्याने दि.३०/०९/१९ पर्यंत मंजुर वाळूचे उत्खनन होऊ शकले नाही.

०२. लिलावधारक यांनी मंजूर परिमाणापैकी २१,४३१ ब्रास वाळूचे उत्खनन व वाहतुक केली असून १३,३३९ ब्रास इतक्या वाळूचे उत्खनन व वाहतूक झालेली नाही असा अहवाल जिल्हाधिकारी सोलापूर यांनी सादर केला आहे. सबब, प्रकरणी मा. मंत्री(महसूल) यांचे आदेश, जिल्हाधिकारी, सोलापूर यांचा अहवाल विचारात घेता सन २०१८-१९ या वर्षाकरीता भिमा नदी पात्रामधील मौजे-मिरी. सिध्दापुर, ता. मोहोळ-मंगळवेढा या वाळू गटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूच्या परिमाणापोटी रक्कम रु.३,८७,८९,६७८/- (एक तीन कोटी सत्याऐंशी लाख एकोण्णवद हजार सहाशे आठ्यात्तर फक्त) एवढ्या रक्कमेचा परतावा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

०३. सबब, मे. आर.बी. एंटरप्रायजेस तर्फे प्रो.प्रा. रेवणसिद्ध बसवराज भिंगे यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशिर रक्कम रु.३,८७,८९,६७८/- (एक तीन कोटी सत्याऐंशी लाख एकोण्णवद हजार सहाशे आठ्यात्तर फक्त) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२- खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम

व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६०/२०२४/व्यय-९, दिनांक २१.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०६२०१६१६२०८०१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.06.20 16:31:37 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, सोलापूर**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१),
७) निवडनस्ती.